**शैक्षणिक वर्ष २००९-१०**
**नवीन व्यावसायिक महाविद्यालयांना मंजूरी**
**(चौथी यादी)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
आदेश क्रमांक:एनजीसी २००९/ (१८९/०९)/ मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट, २००९

**पहावे** : १) शासन निर्णय क्र. एनजीसी २००९/ (३३/०९)/ मशि ३, दिनांक १८ फेब्रुवारी २००९
२) अध्यक्ष, टास्क फोर्स तथा संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.एनजीसी/०९-१०/नवि महा. अतु/ मान्यता/मवि-२-३,११६९ दि.२८मे, २००९

**आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (४) नुसार राज्यातील विद्यापीठांकडून नवीन (पारंपारिक / व्यावसायिक) महाविद्यालयांचे प्रस्ताव शासनाकडे परवानगीसाठी प्राप्त झाले आहेत. विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची शासन निर्णय क्र. एनजीसी २००९/ (३३/०९)/ मशि ३, दिनांक १८ फेब्रुवारी २००९ अन्वये नियुक्त केलेल्या कार्यबलगटाद्वारे तपासणी करुन घेतली आहे. विद्यापीठाच्या व कार्यबलगटाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये प्राप्त अधिकारानुसार खालील नवीन व्यावसायिक महाविद्यालयांना सन २००९-१० या शैक्षणिक वर्षापासून परिच्छेद २ व ३ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन **कायम विना अनुदान तत्वावर** शासनाची परवानगी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | संस्थेचे नांव व पत्ता | प्रस्तावित व्यावसायिक महाविद्यालयाचे नांव व ठिकाण | विद्याशाखेचे महाविद्यालय |
|---|---|---|---|
| मुंबई विद्यापीठ, मुंबई | | | |
| १ | मदर वेलंकणी एज्युकेशन ट्रस्ट, महेश पार्क, तुरिग रोड, नालासोपारा (पू.), ता. वसई, जिल्हा ठाणे | नालासोपारा (पू.), ता. वसई, जिल्हा ठाणे | बी.एस्सी. (हॉस्पीटॅलीटी स्टडीज) |
| पुणे विद्यापीठ, पुणे | | | |
| २ | मॅक्स टेलिकॉम एज्युकेशन सोसायटी, ४७-२, सांकला आर्कड, नल स्टॉप जवळ, कर्वे रोड, पुणे | यूवा महाराष्ट्र कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स ॲण्ड सायन्स, कर्वे रोड, पुणे, जि. पुणे | वाणिज्य (बी.बी.ए.) |
| एस.एन.डी.टी. विद्यापीठ, मुंबई | | | |
| ३ | सेंटर फॉर एज्युकेशन एन्ड हेल्थ सावंतवाडी, द्वारा २०१ गुरुदत्ता कॉम्प्लेक्स, सबनीसवाडी, सावंतवाडी, जिल्हा सिंधुदूर्ग | सावंतवाडी | बी.सी.ए. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | गुडेचा चॅरिटीज गुंडेचा एज्युकेशन ॲकेडमी व्हॅली ऑफ फ्लॉवर्स, ठाकूर विलेज, कांदिवली (प.) | कांदिवली, मुंबई | गृहविज्ञान<br>पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा इन अरली चाइल्डहुड एज्युकेशन |
| राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर | | | |
| ५ | श्री. समर्थ शिक्षण प्रसारक मंडळ, नागपूर<br>८५ हनुमान नगर, नागपूर | ८५ हनुमान नगर, नागपूर | बी.सी.ए.<br>बी.बी.ए.<br>बी.कॉम. (सी.ए.) |
| ६ | श्री. हिरामणजी धोटे विद्या विकास शिक्षण संस्था, इरखेडा, ता. अर्जुनी मोरगांव, जिल्हा गोंदिया | अरुन नगर, ता. अर्जूनी मोरगांव, जि. गोंदिया | बी.सी.ए. |
| सोलापूर विद्यापीठ, सोलापूर | | | |
| ७ | नमदेश्वर, मु.पो. मळेगांव, ता. बार्शी, जिल्हा सोलापूर | कर्मवीर एम. एन. गडसिंग गुरुजी कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, पिंपरी, चिंचवड, ता हवेली, जिल्हा पुणे | बी.बी.ए.<br>बी.सी.ए. |
| स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | | | |
| ८ | स्फुर्ती सेवाभावी संस्था, टाकळी, बोबडे, ता. जि. परभणी | महात्मा गांधी बी.सी.ए. महाविद्यालय, झरी, ता. जि. परभणी | बी.सी.ए. |
| संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती | | | |
| ९ | नूरजहां बेगम चॅरिटेबल ट्रस्ट, वणी, जि. यवतमाळ | नुरजहां बेगम सलाम अहमद वुमन्स कॉलेज ऑफ लॉ. बुराडी, ता.मारेगांव जि. यवतमाळ | विधी- ५ वर्ष |

२. **अटी व शर्ती** :

(१) ज्या संस्थांना नवीन व्यावसायिक महाविद्यालय मंजूर करण्यात आले आहे, त्या संस्थांनी ते भविष्यात कोणत्याही अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रुपये १००/- च्या नॉन - ज्युडिशियल स्टॅम्पपेपरवर त्यांच्या विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, यांचेकडे सादर करावे,

(२) संबंधित विभागीय सहसंचालकांचे वरील अ.क्र. १ मध्ये नमूद केलेले हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांनी संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

(३) विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्र.२ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

(४) नवीन व्यावसायिक महाविद्यालयांनी कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

(५) नवीन व्यावसायिक महाविद्यालय मंजूर करण्यात आलेल्या संस्थांनी शैक्षणिक वर्ष २००९-१० व २०१०-११ मध्ये नॅक ॲक्रेडिएशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळाल्यास सदर महाविद्यालयाची मान्यता आपोआप रद्द होईल.

(६) स्थानिक विद्यार्थ्यांची गरज विचारात घेऊन नकारात्मक शिफारस असलेल्या महाविद्यालयांना मान्यता देण्यात आली आहे.

३ विद्यापीठाचे संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठाने करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८३११९३३२००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सदाशिव शिवदास )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

(१) सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे

(२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

(३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण

(४) सर्व संबंधित संस्था

(५) निवड नस्ती मशि- ४

C:\Documents and Settings\hp\My Documents\Jt Scy\GR new college-addl div-faculty-sub\Gr-New Professional Colleges-२००९-१०-४th list.doc